वन जमाबंदी अधिकाऱ्यांचे कार्यक्षेत्र निश्चित करणे व त्यांचे प्रतिवेदन व पुनर्विलोकन अधिकारी निश्चित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एफएलडी-२०१३/प्र.क्र.६/फ-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- ६ जून, २०१५

वाचा :-

**शासन निर्णय समक्रमांक दिनांक १ जुलै, २०१४.**

**प्रस्तावना :-**

भारतीय वन अधिनियम, १९२७ मधील कलम ४ अन्वये अधिसूचित क्षेत्रातील हक्क सुनिश्चित करण्यासाठी चौकशी करण्याकरिता वन जमाबंदी अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात येते. नियुक्ती नंतर वन जमाबंदी अधिकारी यांनी चौकशी पूर्ण करुन शासनास अहवाल सादर करणे अभिप्रेत असते. वन जमाबंदी अधिकाऱ्यांमार्फत होत असलेल्या कार्यवाहीबाबत शासन स्तरावर नियमित आढावा सुरु आहे. कलम ४ अन्वये अधिसूचित क्षेत्रासंदर्भात वन जमाबंदी अधिकाऱ्यांमार्फत लवकर चौकशी पूर्ण झाल्यास, असे क्षेत्र कलम २० अंतर्गत अंतिमत: राखीव वने म्हणून सत्वर अधिसूचित करणे सोयीस्कर होईल. वन जमाबंदी अधिकारी यांना त्यांच्या कामकाजात मार्गदर्शन प्रदान करण्याबरोबरच त्यांचेवर पुरेसे संनियत्रण ठेवण्याची तसेच त्यांचे कार्यक्षेत्र निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यादृष्टीने शासनाने दिनांक १ जुलै, २०१४ रोजी शासन निर्णय निर्गमित केला होता.

**शासन निर्णय :**

२. वन जमाबंदी अधिकाऱ्यांचे कार्यक्षेत्र सर्व साधारणपणे संबंधित महसूल विभाग स्तरावर असून त्यांच्या कामकाजाचे आकलन व त्यानुषंगीक कार्यवाही मुख्य वनसंरक्षक (प्रा.), यांचे स्तरावर होत असल्याने यापुढे वन जमाबंदी अधिकाऱ्यांचे प्रतिवेदन व पुनर्विलोकन अधिकारी पुढील प्रमाणे राहतील :-

| अ. क्र. | वन जमाबंदी अधिकारी | कार्यक्षेत्र | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | वन जमाबंदी अधिकारी, अमरावती | अमरावती महसूल विभागातील जिल्हे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अमरावती. | विभागीय आयुक्त, अमरावती |
| २ | वन जमाबंदी अधिकारी, औरंगाबाद | औरंगाबाद महसूल विभागातील जिल्हे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), औरंगाबाद | विभागीय आयुक्त, औरंगाबाद |
| ३ | वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी | कोंकण महसूल विभागातील जिल्हे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर. | विभागीय आयुक्त, कोंकण |
| ४ | वन जमाबंदी अधिकारी, भोर (पुणे) | पुणे महसूल विभागातील जिल्हे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पूणे. | विभागीय आयुक्त, पुणे |
| ५ | वन जमाबंदी अधिकारी, चंद्रपूर, स्थित नागपूर | नागपूर महसूल विभागातील जिल्हे | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर | विभागीय आयुक्त, नागपूर |

३. नाशिक महसूल विभागात स्वतंत्र वन जमाबंदी अधिकाऱ्याचे पद नसून संबंधित उपजिल्हाधिकारी हे वन जमाबंदी अधिकाऱ्यांचे काम पाहतात. त्यामुळे संबंधित जिल्हाधिकारी तसेच संबंधित विभागीय आयुक्त उप जिल्हाधिकारी कामाचे मूल्यमापन करताना त्यांनी जमाबंदी बाबत केलेल्या कामांचेही आंकलन करतील.

४. ज्या महसूल विभागात एकापेक्षा अधिक मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) आहेत, तेथे विभागीय आयुक्त मुख्यालयाच्या ठिकाणी असलेले मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) हे इतर मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांच्याकडून अभिप्राय प्राप्त करुन संबंधित वन जमाबंदी अधिकारी यांचे गोपनीय अहवाल लिहितील.

५. वन जमाबंदी अधिकारी, भोर (पुणे) यांचेकडे काही प्रकरणे कोंकण महसूल विभागामधील तसेच वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांचेकडे काही प्रकरणे पुणे महसूल विभागामधील आहेत, यापुढे उक्त दोन्ही वन जमाबंदी अधिकाऱ्यांचे कार्यक्षेत्र रकाना क्र. ३ मध्ये दर्शविल्या प्रमाणे राहतील, तथापि, ज्याप्रकरणी कलम ६ अंतर्गत व त्यापुढील कार्यवाही सुरु झालेली आहे, ती सर्व प्रकरणे वन जमाबंदी अधिकारी, भोर (पुणे) व वन जमाबंदी अधिकारी, सावंतवाडी यांनी पुर्णत्वास आणून जमाबंदी अहवाल शासनास सादर करावे.

६. मात्र, ज्या प्रकरणी कलम ४ ची अधिसूचना निर्गमित झाल्यानंतर पुढील कोणतीही कार्यवाही झाली नसेल, अशी सर्व प्रकरणे उक्त दोन्ही वन जमाबंदी अधिकारी यांनी पुढील कार्यवाहीस्तव एकमेकांकडे हस्तांतरित करावी. विभागीय आयुक्त, पुणे आणि विभागीय आयुक्त, कोंकण यांनी कलम ४ मधील मुळ अधिसूचनेचा संदर्भ देऊन वन जमाबंदी अधिकाऱ्यांच्या नियुक्तीत उक्त प्रमाणे बदल होत आहे, यासंदर्भात पूरक अधिसूचना निर्गमित करावी.

७. सदर शासन निर्णय दिनांक १.०४.२०१५ पासून पूर्व लक्षी प्रभावाने अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०६०६१४४८२४९४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.06.06 14:52:18 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत:**

१) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (हेड ऑफ फॉरेस्ट फोर्स), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व विभागीय आयुक्त.

५) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव).

६) सर्व वनसंरक्षक (वन्यजीव / कार्य आयोजना)

७) सर्व जिल्हाधिकारी.

८) सर्व उप वनंसरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव).

९) नाशिक महसूल विभागातील सर्व उप विभागीय अधिकारी.

१०) सर्व वन जमाबंदी अधिकारी (अमरावती /सावंतवाडी/भोर/औरंगाबाद/चंद्रपूर स्थित नागपूर)

*******